प्रशासकीय लेखा परीक्षण करण्यासाठी
प्रशासकीय मूल्यमापन समितीची नियुक्ती.

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्र.शाकाप-१००९/प्र.क्र.१४/०९/१८ (र. व का.),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ७ ऑक्टोबर, २०११.

**संदर्भ :-** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शाकाप-१००६/ १०८२/१८ (र. व का.), दि. १४.११.२००७.

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ शासन अधिसूचना क्रमांक : एसआरव्ही-२००४/ प्र.क्र.१५/०४/१२, दिनांक २५ मे, २००६ अन्वये दिनांक ०१ जुलै, २००६ पासून लागू झाला आहे. सदरहू अधिनियमातील कलम १० नुसार धारिका निकाली काढण्यासाठी विवक्षित असा कालावधी विहित केला आहे. अर्थात धारिका निकाली काढणे याचा अर्थ अंतिम निर्णय होण्याच्या दृष्टीने निकाली काढणे असा या अधिनियमात अर्थ अभिप्रेत आहे. सबब, सदरील अधिनियमानुसार निर्णय होऊन निकाली काढण्यात येणाऱ्या धारिकांचा गुणात्मक (Qualitively) दर्जा राखला जाणे अपेक्षित आहे.

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम १२ मध्ये या अधिनियमातील प्रकरण तीन मधील तरतुदींचे अनुसरण केले जात आहे किंवा कसे याची तपासणी करण्यासाठी व विहित रितीने प्रशासनिक मूल्यमापन करण्यासाठी एका यंत्रणेची तरतूद आहे. यानुसार असे प्रशासकीय मूल्यमापन सुरु करण्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शाकाप-१००६/१०८२/ १८ (र. व का.), दिनांक १४.११.२००७ अन्वये समिती गठीत केली होती. परंतु सदर समितीचे अध्यक्ष व सदस्य यांचेकडील कामकाजाचा भार विचारात घेता सदर प्रशासकीय लेखा परीक्षणाचे

काम अन्य संस्थेकडे देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार आता खालीलप्रमाणे निर्णय देण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम १२ नुसार राज्यातील सर्व शासकीय कार्यालयांत प्रकरण-३ मधील तरतुदींचे अनुसरण केले जात आहे किंवा कसे याची तपासणी करण्याचे व विहित रितीने प्रशासकीय मूल्यमापन करण्याचे काम यशदा कडे सोपविण्यात येत आहे. यशदाने परीक्षणाची पध्दत शासनाकडून मान्य करून घ्यावी.

२. संदर्भाधीन दिनांक १४.११.२००७ रोजीचा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

३. सदरील शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०११११००७१५४८५१००१-असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( दि.दा.आढाव )
**अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
मा. राज्यपाल यांचे सचिव (५ प्रती),
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव (५ प्रती),
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव (५ प्रती),
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
मा. मुख्य सचिव यांचे कार्यालय,
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
महासंचालक, यशदा, पुणे
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय,
सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख / प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती),
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.